पेट्रोलपंपाच्या आराखड्यास (Layout) व पेट्रोलपंपास राष्ट्रीय हामार्ग/राज्यमार्ग/प्रमुख जिल्हामार्ग इत्यादी वरून पोचमार्ग बांधण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक-आरबीडी-२०१६/प्र.क्र.५०९/रस्ते-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ जून,२०१७.

**वाचा:-** आय.आर.सी.१२-२००९

**प्रस्तावना:-**

पेट्रोलपंपाच्या आराखड्यास व पेट्रोलपंपास राष्ट्रीय महामार्ग/राज्यमार्ग/प्रमुख जिल्हामार्ग इत्यादी वरून पोचमार्ग बांधण्यास परवानगी बांधण्याबाबतचे शासनास प्रस्ताव प्राप्त होत असतात. तसेच, याबाबत नियमातील तरतूदीतून शिथीलता देण्याबाबत प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर करण्यात येतात. पेट्रोलपंपापासून जंक्शनचे अंतर तसेच दोन पेट्रोलपंपामधील अंतर याबाबतच्या मार्गदर्शक सुचना आय.आर.सी. १२-२००९ अन्वये विहीत केलेल्या आहेत. सदरहू मार्गदर्शक सुचना या Transport Planning, Traffic Engineering and road safety committee (H-१) या समितीने शिफारस केल्यानुसार विहीत करण्यात आल्या आहेत.

राज्यातील अनेक प्रमुख जिल्हा मार्ग हे राज्यमार्ग म्हणून व अनेक राज्यमार्ग हे राष्ट्रीय महामार्ग असे दर्जोन्नत करण्यात येत असतात. नजीकच्या काळात मोठया प्रमाणावर राज्यातील रस्ते राष्ट्रीय महामार्ग म्हणून दर्जोन्नत झालेले आहेत. या कारणाकरिता आय.आर.सी. १२-२००९ मधील नियत्रंक नियमात बदल न करण्याचा जाणीवपूवक निर्णय शासनाने घेतलेला आहे. याअनुषंगाने संबंधीत अधिकारी वर्गाकरिता खालील आदेश देण्यात येत आहे.

**आदेश:-**

"पेट्रोलपंपाच्या आराखड्यास व पेट्रोलपंपास राष्ट्रीय महामार्ग/राज्यमार्ग/प्रमुख जिल्हामार्ग इत्यादी वरून पोचमार्ग बांधण्यास परवानगी देण्याबाबतच्या प्रस्तावाची संबंधित कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्या स्तरावर परिपूर्ण छाननी करण्यात यावी. छाननी केल्यानंतर आय.आर.सी.१२-२००९ नियमातील विहित तरतुदीनुसार असलेले प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर करण्यात यावेत. अन्यथा, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, यांनी त्यांच्या स्तरावरच आय.आर.सी.१२-२००९ नियमातील विहित तरतुदीनुसार नसलेले प्रस्ताव अमान्य करावेत. तसेच, यापुढे आय.आर.सी.१२-२००९ नियमातून शिथिलता देण्याबाबतचे प्रस्ताव शासनास सादर करण्यात येऊ नयेत".

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२८१५१६४७४५१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sulbha Narendra Pore

Digitally signed by Sulbha Narendra Pore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=632da1ba3256b2fbbc26a3e7e3a4a687a7bd8c12d2dd613475f316ac661f40ee, cn=Sulbha Narendra Pore
Date: 2017.06.28 15:13:56 +05'30'

**( सु.न.पोरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव
३. सचिव (रस्ते) ,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
४. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई--३२
५. सर्व मुख्य अभियंते (विद्युत वगळून)
६. सर्व अधिक्षक अभियंते (विद्युत वगळून)
७. सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युत वगळून)
८. निवड नस्ती, कार्यासन रस्ते-७